सोनवद प्रकल्पावरील वक्रव्दारे तसेच सेवाव्दारे यांची विशेष दुरुस्ती काम करणेच्या कामास प्रशासकीय मान्यता

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/( ५०७/१४)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई

तारीख: ०९/९/२०१४

**वाचा**

**कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्र मुअ/तापाविम/ प्रशा - ६/४०९० सन २०१४ दिनांक २३.८.२०१४**

**प्रस्तावना**

उपरोक्त पत्रान्वये सोनवद प्रकल्पाच्या वक्रव्दारे व सेवाव्दारे या यांत्रिकी भागाच्या दुरुस्ती कामाच्या प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्ताव सादर केला आहे.धरण सुरक्षितता संघटना,नाशिक तसेच कार्यकारी अभियंता(यांत्रिकी) व कार्यकारी अभियंता,धुळे पाटबंधारे प्रकल्प,धुळे यांनी संयुक्तरित्या भेट देवून निदर्शनास आलेल्या बाबींची निरीक्षण टिप्पणीमध्ये नमूद केलेल्या दुरुस्तींच्या कामानुसार अंदाजपत्रक यांत्रिकी विभागाकडून तांत्रिक शिफारशीसह सादर करण्यांत आलेले आहे. या कामामध्ये जलव्दारांचे दुरुस्ती कामे, विदयुतीकरण, रंगकाम व नवीन लोखंडी शिडया तयार करणे इ. कामे अंतर्भूत केलेली आहेत. धरण सुरक्षिततेच्या दृष्टीने सदरची कामे करणे आवश्यक असल्याने सोबतच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यतेसाठी विनंती केलेली आहे.वरील व्दार दुरुस्ती कामे धरण सुरक्षिततेच्या दृष्टीने आवश्यक असल्याने विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयाव्दारे सोनवद प्रकल्पावरील वक्रव्दारे तसेच सेवाव्दारे यांची दुरुस्ती व इपॉक्सी रंगकाम कामासाठी ८८.२४ लक्ष (कामावरील खर्च रु ८०.२२ लक्ष व रु ८.०२ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१)शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी

२)सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

३) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्तेतीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (mile stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार mile stone साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty)

आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

४) अंदाजपत्रकात समाविष्ट बाबीचे संकल्पन, वहन अंतर तसेच दर बाहय बाबीचे सक्षम स्तरावर मान्यता घेवून प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

५) विशेष दुरुस्तीचे काम यांत्रिकी संघटनेकडून करुन घेण्यात यावे.

६) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा यासाठी भाग भांडवली अंशदान( १२)( ०३) तापी पाटबंधारे विकास महामंडळास( ४७०१ जे १८५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ५४ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे .

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग- पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे..

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१२५६०७६२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.09.09 12:50:36 +05'30'

( कि.ल.संखे )

**शासनाचे कक्ष अधिकारी**

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१६.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण , जळगांव
२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नाशिक
२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक
२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/( ५०७ /१४)/ सिंव्य(कामे) दिनांक ९. ९.२०१४ चे प्रपत्र

**परिशीष्ट**

| **अ.क्र** | बाब | **अंदाजीत खर्च (लक्ष रुपये )** |
|---|---|---|
| १) | सोनवद प्रकल्पावरील वक्रव्दारे व उच्चालक तसेच सेवाव्दारे यांची दुरुस्ती करणे व इपॉक्सी रंगकाम करणे | ८०.२२ |
| २ | अनुषंगिक खर्च १० टक्के | ८.०२ |
| | एकूण | ८८.२४ |

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.09.09 12:51:06 +05'30'

( कि.ल.संखे )

**शासनाचे कक्ष अधिकारी**